भगूर नगरपरिषद, जि.नाशिक येथे स्वातंत्र्यवीर विनायक दामोदर सावरकर यांच्या जीवनावर थीमपार्क उभारणे.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन शुध्दीपत्रक क्रमांक : टिडीएस-२०२३/०३/प्र.क्र.१४३/पर्यटन-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक : ११ फेब्रुवारी, २०२५.

**संदर्भ :** १) शासन निर्णय क्रमांक : टिडीएस-२०२३/०३/प्र.क्र.१४३/पर्यटन-२, दि.१०.१०.२०२४
२) शासन शुध्दीपत्रक क्रमांक : टिडीएस-२०२३/०३/प्र.क्र.१४३/पर्यटन-२,दि.२७.१२.२०२४

<u>शुध्दीपत्रक</u> :

भगूर, जि.नाशिक येथे स्वातंत्र्यवीर विनायक दामोदर सावरकर यांच्या जीवनावर आधारित थीम पार्क उभारण्याकरिता उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णय क्र.१ अन्वये रु.१५.०० कोटी इतक्या किमतीच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून संदर्भाधीन शासन शुध्दीपत्रक क्र.२ अन्वये जिल्हाधिकारी, नाशिक यांना सुधारित रु.१.५० कोटी इतकी रक्कम वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली होती. आता, संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयातील अटी व शर्तीमधील अट क्रमांक २,१०,१२,१३ या खालीलप्रमाणे आहेत :-

२) कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. मंजूर अनुदानापेक्षा जादा खर्च झाल्यास त्याची जबाबदारी जिल्हाधिकारी, नाशिक यांची राहील व जादा खर्च प्रित्यर्थ जादा अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

१०) यापूर्वी या मंदिरातील विविध कामाकरीता, नगर विकास विभाग, नियोजन विभाग, जिल्हा नियोजन मंडळ व इतर कोणत्या योजनेतून रक्कम घेतली गेली नाही, याबाबत नियंत्रण अधिकारी म्हणून जिल्हाधिकारी यांनी खातरजमा करावी.

१२) कामाची द्विरुक्ती होणार नाही याची खातरजमा जिल्हाधिकारी आणि प्रकल्प अंमलबजावणी यंत्रणा यांनी करुन प्रमाणित करुन घ्यावे.

१३) प्रकल्प कार्यान्वयीन यंत्रणा सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत करण्यात यावी.

**वरील अट क्रमांक २,१०, १२ व १३ या मध्ये खालीलप्रमाणे बदल करण्यात येत आहे:-**

२) कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. मंजूर अनुदानापेक्षा जादा खर्च झाल्यास त्याची जबाबदारी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ यांची राहील व जादा खर्च प्रित्यर्थ जादा अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

**१०)** यापूर्वी या विविध कामाकरीता, नगर विकास विभाग, नियोजन विभाग, जिल्हा नियोजन मंडळ व इतर कोणत्या योजनेतून रक्कम घेतली गेली नाही, याबाबत नियंत्रण अधिकारी म्हणून संचालक, पर्यटन संचालनालय यांनी खातरजमा करावी.

**१२)** कामाची द्विरुक्ती होणार नाही याची खातरजमा संचालक, पर्यटन संचालनालय आणि प्रकल्प अंमलबजावणी यंत्रणा यांनी करुन प्रमाणित करुन घ्यावे.

**१३)** प्रकल्पाचे कार्यान्वयीन महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळामार्फत करण्यात यावे.

**तसेच, शासन निर्णय दि.१०.१०.२०२४ मधील परिच्छेद क्रमांक ३ खालीलप्रमाणे आहे:-**

०३. या प्रकरणी मंजूर करण्यात आलेल्या (प्रादेशिक पर्यटन योजनेंतर्गत) सहायक अनुदानाची रक्कम आहरण करुन संबंधितांना वितरीत करण्याकरीता जिल्हास्तरावरील कामांसाठी जिल्हा नियोजन अधिकारी, नाशिक यांना “आहरण व संवितरण अधिकारी” व जिल्हाधिकारी, नाशिक यांना “नियंत्रण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

**आता उपरोक्त नमूद परिच्छेद क्र. ३ मध्ये खालीलप्रमाणे बदल करण्यात येत आहे :-**

०३. या प्रकरणी मंजूर करण्यात आलेल्या (प्रादेशिक पर्यटन योजनेंतर्गत) सहायक अनुदानाची रक्कम आहरण करुन संबंधितांना वितरीत करण्याकरीता मुख्य लेखा अधिकारी, पर्यटन संचालनालय यांना “आहरण व संवितरण अधिकारी” व संचालक, पर्यटन संचालनालय यांना “नियंत्रण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

**०२.** उर्वरित अटी व शर्ती संदर्भाधीन शासन निर्णय क्र.१ प्रमाणे राहतील.

**०३.** सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२५०२१११५०४३४३०२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by VIJAY KRISHNAJI POWAR
Date: 2025.02.11 15:09:03 +05'30'

**(विजय कृष्णाजी पोवार)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई
३. जिल्हाधिकारी, नाशिक
४. जिल्हा नियोजन अधिकारी, नाशिक
५. मुख्य लेखा अधिकारी, पर्यटन संचालनालय, मुंबई
६. मुख्याधिकारी, नगरपालिका, भगूर
७. निवड नस्ती, (पर्यटन-२)